राज्यातील "जातीय सलोखा योजना"
**राबविण्याबाबत सुधारित योजना...**

# महाराष्ट्र शासन

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक डीआयएस २००३/प्र.क्र.१२८/विशा-१ ब**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- ७ फेब्रुवारी, २००५**

## शासन निर्णय

**पहावे :- शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : डीआयएस-२००२/सीआर-८४ /विशा-१ ब, दिनांक ३०.९.२००२ व समक्रमांकित शुध्दिपत्रक दि. ४.१०.२००२**

**शासन निर्णय** :- शासन निर्णय क्रमांक डीआयएस-२००२/सीआर-८४/विशा-१ ब, दिनांक ३०.९.२००२ अन्वये जाहीर करण्यात आलेली जातीय सलोखा योजना राज्यात सर्वत्र प्रगल्भतेने सुधारित स्वरुपात राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला असून या योजनेचे उद्दिष्ट, स्वरुप, कार्यपध्दती इत्यादी बाबी सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये विहित करण्यात आल्या आहेत.

२. या योजनेअंतर्गत राबविण्यात येणारे उपक्रम/कार्यक्रमांसाठी पोलीस आयुक्त/ पोलीस अधीक्षक यांना देणग्या स्वीकारण्यास शासन परवानगी देत आहे. याबद्दलची मार्गदर्शक तत्वे सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद करण्यात आली आहेत. देणगी स्वीकारुन जमा केलेल्या व शासकीय मदत मिळवून एकूण गंगाजळीची जास्तीत जास्त मर्यादा खालीलप्रमाणे विहित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई | रु. १५,००,०००/- |
| २) | पोलीस आयुक्त, नागपूर/पुणे/ठाणे | रु. १०,००,०००/- |
| ३) | इतर पोलीस आयुक्त/पोलीस अधीक्षक | रु. २,५०,०००/- |

३. वरील योजनेसाठी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या कार्यालयातून होणारा खर्च "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस-१०८-राज्य मुख्यालय पोलीस-(०२) शहर पोलीस (०२)(०१) आस्थापना-०५-कार्यालयीन खर्च" (२०५५००९७) व पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

यांचे कार्यालयातून होणारा खर्च "मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस-१०९-जिल्हा पोलीस(००)(०१) जिल्हा पोलीस दल-०५-कार्यालयीन खर्च" (२०५५०१६८) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो दरवर्षी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(प्र. बा. हिर्लेकर)**
**उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व पोलीस आयुक्त, (बृहन्मुंबईसह)
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व जिल्हादंडाधिकारी
सर्व पोलीस अधीक्षक,
महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
महालेखापाल-१/२, (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
वित्त विभाग, (व्यय-७/८, अर्थसंकल्प ३/४)
गृह विभाग, बीयुडी-१,
निवडनस्ती विशा १ ब

*****

D:\Yogesh\2005\Spl-1B\Letter\G.r.

एच–912 –1अ

## परिशिष्ट - अ

## जातीय सलोखा योजना - मार्गदर्शक तत्वे

सुधारित जातीय सलोखा योजना राज्यात सर्वत्र राबविण्याचा शासनाने आता निर्णय घेतला असून या सुधारित योजनेअंतर्गत खालील उपक्रम पोलीस आयुक्त कार्यक्षेत्रात व जिल्ह्यात वर्षभर राबविणे आवश्यक आहे.

अ) योजनेची उद्दीष्टे :-

१) सर्व धर्म, जाती/जमातीच्या लोकांमध्ये वर्षभर बंधुभाव, मैत्रीचे संबंध रहावेत,

२) सर्व धर्म, जाती/जमातीच्या धार्मिक सण, उत्सव व मिरवणूका इत्यादींच्या वेळी ताणतणाव, मतभेद निर्माण होणार नाहीत, यासाठी प्रयत्न करणे,

३) सर्वतोपरी दक्षता घेऊनही दुर्दैवाने काही अनुचित प्रकार घडल्यास, सर्व जाती धर्मांच्या प्रमुख व्यक्तींच्या सहकार्याने निर्माण झालेला तणाव दूर करण्याचा प्रयत्न करणे.

ब) योजनेचे स्वरुप :-

१) दि. ८.१२.९९ च्या शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या मोहल्ला समितीच्या बैठकांद्वारे सर्व धर्मियांबरोबर सतत संपर्कात राहून त्यांच्यामध्ये सामंजस्य ठेवणे,

२) समाजामध्ये सामंजस्य निर्माण करण्यासाठी मोहल्ला समितीच्या माध्यमातून विविध पातळीवर कार्यक्रम करणे,

I) बौध्दीक पातळीवरील कार्यवाही :- संभाषण, चाचणी (कोडे) स्पर्धा, भित्तीपत्रके स्पर्धा, वाद-विवाद स्पर्धा आयोजित करणे,

II) क्रीडा पातळी :- तरुण हौशी व ज्येष्ठ नागरिकांसाठी खेळ/क्रीडा स्पर्धा आयोजित करणे,

III) सामाजिक पातळी :- विविध सामाजिक कार्यक्रमांदरम्यान विविध धर्मियांमधील सामंजस्य वाढविण्यासाठी प्रोत्साहनपर कार्यक्रम करणे, उदा. बक्षीस वाटप, मिठाई वाटप, पदक वाटप इ.,

३) एका विशिष्ठ भागात वेळोवेळी उद्भवणाऱ्या जातीय तणावाची कारणे शोधून त्याची प्रक्षुब्धता कमी/नष्ट करण्याची कार्यवाही करणे,

४) स्वतंत्र एजन्सीमार्फत या योजनेची कार्यशैली आणि परिणामकारकतेविषयी मूल्यमापन करुन घेणे,

५) पोलीसांची भूमिका आणि कार्यवाही परिणामकारक आणि आक्रमक असावी, बचावात्मक नसावी,

६) सातत्याने प्रयत्न करुन जातीय सलोखा ठेवण्याबाबत आम जनतेत जागरुकता निर्माण करणे आणि त्या प्रयत्नांची सातत्याने देखरेख करणे,

७) महानगरपालिका, आरोग्यखाते, पाणी पुरवठा खाते, म.रा.वि.मंडळ, शिक्षण खाते इत्यादींच्या जातीय सलोखा कार्यक्रमात सहभाग असावा आणि त्यांच्यावर काही विशिष्ट जबाबदाऱ्या सोपविण्यात याव्यात,

८) जातीय सलोख्याची भावना ही समाजातूनच येणे आवश्यक आहे म्हणून समाजातील विविध घटकांना जातीय सलोखा राखण्याकामी प्रोत्साहित करणे, पोलीसांची भूमिका ही

मदतनिसांची (facilitator) असावी. जातीय सलोखा राखणे ही पूर्णपणे पोलीसांची जबाबदारी आहे, ते आपल्या स्वार्थासाठी हे कार्यक्रम करतात असा भास निर्माण होऊ देऊ नये,

९) परिवर्तनशील विचारधाराद्वारे पुरोगामी समाज घडवून आणणारे समाजातील विविध घटकांतील नेते, शिक्षक, धार्मिक गुरु, विद्यार्थी नेते इत्यादींच्या सहभाग आवश्यक आहे.

क) <u>सर्वोत्कृष्ट मंडळाची निवड</u> :-

१) सर्वोकृष्ट शिस्तबध्द मंडळ निवडण्याकरिता सर्व जाती धर्मातील व क्षेत्रातील प्रतिष्ठित नागरिकांच्या निवड समिती/निरीक्षण समिती स्थापन करण्यात याव्यात व निवड समितीच्या सदस्यांची नांवे जाहीर आवाहनाच्या पत्रकात प्रसिध्द केली जावीत,

२) शिस्तबध्द गणपती, ताजीया/सवारी, नवरात्रोत्सव इत्यादी मंडळे निवडण्याकरिता कायदा व सुव्यवस्था व जातीय सलोखा राखण्याच्या दृष्टीकोनातून निकष, गुणवत्ता व ठरवून दिलेले गुण हे जाहीर आवाहन पत्रकात प्रसिध्द करण्यात यावेत,

३) निवड समितीच्या सदस्याना शिस्तबध्द गणपती, ताजीया/सवारी, नवरात्रोत्सव इत्यादी मंडळे यांचे निरीक्षण करुन गुण वितरण करण्याकरिता गुण वितरण तक्ता तयार करुन देण्यात यावा,

४) निरीक्षण समितीच्या सदस्यांना बॅजेस देण्यात यावेत,

५) हिंदू/मुस्लीम यांचे धार्मिक सण/उत्सव व मिरवणूका संपल्यानंतर शिस्तबध्द मंडळे यांना मान्यवरांच्या (मंत्री, पोलीस आयुक्त, जिल्हाधिकारी, पोलीस अधीक्षक इत्यादी) हस्ते जाहीर झालेली पारितोषिके / बक्षीसे व प्रमाणपत्रे देऊन त्यांचा जाहीर सत्कार करण्यात यावा,

६) शिस्तबध्द मंडळे, निवड समिती सदस्यांना त्यांच्या कामगिरीबाबत प्रमाणपत्रे / प्रशस्तीपत्रे देऊन त्यांचाही वरील समारंभात सत्कार करण्यात यावा.

ड) <u>देणगी व निधी</u> :-

१) संबंधित अधिकाऱ्यांना देणगीदाराकडून देणगी स्वीकारण्यास परवानगी देण्यात येत आहे,

२) शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे शासनाकडून काही प्रमाणात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

इ) <u>देणगीदाराबद्दल अटी/शर्ती</u> :-

१) देणगीदाराची प्रतिमा, चारित्र्य व पूर्वेतिहास तपासूनच स्थानिक देणगीदार/स्वयंसेवी संस्था इत्यांदींकडून देणगी स्वीकारण्यात यावी,

२) निधी/देणग्या कोणत्याही प्रकारच्या दबावाखाली गोळा करण्यात येऊ नयेत,

३) देणग्यांबद्दल योग्य ती पावती देण्यात यावी,

४) निधी जमा करणे व त्याचा विनियोग या बाबी नि:पक्षपातीपणे करण्यात याव्यात.

ई) <u>बँक खाते व त्याचे स्वरुप</u> :-

शासनाची एजंट असलेल्या राष्ट्रीयकृत स्टेट बँक ऑफ इंडियाच्या कोणत्याही एका शाखेत संयुक्त / वैयक्तिक खाते उघडण्यात यावे,

१) प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणी पोलीस अधीक्षक व जिल्हा दंडाधिकारी यांच्या संयुक्त नावाने खाते असावे,

२) पोलीस आयुक्तालयात पोलीस आयुक्त व परिमंडळाचे पोलीस उपायुक्त यांच्या संयुक्त नावाने खाते असावे,

३) सदर खाते एकाच वेळी दोघांपैकी कोणालाही वापरता आले पाहिजे,

४) शासनातर्फे मंजूर करण्यात आलेला निधी आयुक्तालयात पोलीस आयुक्त यांनी संबंधित पोलीस उपायुक्त यांना तर पोलीस महासंचालक यांनी पोलीस अधीक्षक यांना वितरीत करावा.

**फ) बँक खात्यात जमा होणारी रक्कम :-**

देणगीदारांकडून देणगीच्या स्वरुपात प्राप्त होणारे धनादेश/रोख रक्कम या खात्यात जमा करावी. यासाठी त्या त्या स्तरावर (जिल्हा/परिमंडळ) स्वतंत्र नोंदवही ठेवण्यात यावी.

**ग) बँक खात्यातून होणारा खर्च :-**

बँक खात्यातून खालील बाबींवर खर्च करण्याचे पूर्ण अधिकार, जिल्ह्याच्या ठिकाणी पोलीस अधीक्षक यांना तर आयुक्तालयात परिमंडळाच्या पोलीस उपायुक्तांना राहतील.

१) योजना राबविण्यासाठी आवाहन पत्रके छापणे,

२) शिस्तबध्द मंडळे निवडण्यास गुणवितरण तक्ते छापणे,

३) शिस्तबध्द मंडळांना देण्याकरिता प्रमाणपत्रे छापणे,

४) याबद्दलच्या बैठकीसाठी येणारा खर्च,

५) पावती पुस्तकाची छपाई,

६) रोख नोंदवही, रजिस्टर इ.,

याबाबतचा खर्च देणगीदाराकडून मिळणाऱ्या देणग्यांना प्रतिसाद, आवश्यकता इ. विचारात घेऊन करावा.

**घ) बँक खात्याचा हिशोब व नियंत्रण :-**

बॉम्बे फायनांशिएल रुल्स, १९५९ च्या नियम १२ अन्वये हिशोब ठेवण्याबाबत बँक खातेधारक अधिकारी जबाबदार असेल. सदर खात्याबाबतची जमा-खर्चाची विवरणपत्रे दर सहामाहीस त्या अधिकाऱ्याने अपर मुख्य सचिव (गृह) यांना प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सादर करावीत. सदर खात्याचा वार्षिक हिशोब व कामकाजाच्या नोंदीबाबतची तपासणी/वार्षिक हिशोब पडताळणी, परवानाधारक लेखा परीक्षकांकडून (Chartered Accountant) करण्यात यावी.

**ह) दैनंदिन नोंदी ठेवणे :-**

या योजने अंतर्गत येणाऱ्या देणग्या व खर्च यांचा हिशोब स्वतंत्र नोंदवहीत रोजच्या रोज नोंदवून ठेवावा.

**ज) मार्गदर्शन व संनियंत्रण :-**

प्रस्तुत उपक्रमास समाज व्यवस्थेचा भाग बनविण्याकरिता जातीय सलोखा योजना आणि बीट ते पोलीस ठाणे ते उपविभाग ते परिमंडळ/जिल्हा आणि परिक्षेत्रातील विविध स्तरांवरील अधिकाऱ्यांची कर्तव्ये पोलीस महासंचालक यांनी निश्चित करावीत आणि मुंबई पोलीस नियमावलीमध्ये (Bombay Police Mannual) त्यांचा अंतर्भाव करावा. वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या आकस्मिक भेटी आणि निरीक्षणांच्या टिप्पणीमध्ये त्याचा समावेश करावा, जेणेकरुन प्रस्तुत योजनेची अंमलबजावणी निव्वळ देखावा न ठरता गांभीर्यपूर्वक आखलेली एक योजना ठरेल.

*****

D:\Yogesh\2005\Spl-1B\Letter\G.r.

रोटा/एच-912(700-02-2005)-3.